**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः ससप्र ११२४/प्र.क्र.९१/प्रशा-१**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १२ ऑगस्ट, २०२४.

## आदेश

श्री.रविंद्र वसंतराव गुरव, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांची, ‘राज्य सेवा हक्क आयोग, कोकण’ या कार्यालयातील उप सचिव हे पद, तात्पुरत्या स्वरूपात ‘सह सचिव’ संवर्गात उन्नत करून, सदर पदावर खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रथमत: १ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) श्री.गुरव, सह सचिव ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, श्री.गुरव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, सामान्य प्रशासन विभागाच्या आस्था-१ व लोदिक या कार्यासनांनी आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. राज्य सेवा हक्क आयोग, कोकण कार्यालयातील उप सचिव हे पद सह सचिव संवर्गात उन्नत करण्याची कार्यवाही लोदिक कार्यासनाने करावी.

४. श्री.गुरव, सह सचिव यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामान्य प्रशासन विभाग /आस्था-१ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

५. श्री.गुरव, सह सचिव यांना 'राज्य सेवा हक्क आयोग, कोकण' या कार्यालयातील प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होण्याकरिता सामान्य प्रशासन विभाग/आस्था-१ कार्यासनाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८१२१६५०१२७८०७ हा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.12 17:05:10 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अ.मु.स/प्र.स., मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स (र व का), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, कोकण.
६. सह/उप सचिव, आस्था-१/ लोदिक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. श्री.रविंद्र वसंतराव गुरव, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. (विभागामार्फत)
८. निवडनस्ती प्रशा-१.